**दिनांक १/१/२००६ ते दिनांक २६/२/२००९ या कालावधीत सेवानिवृत्त झालेल्या निवृत्तीवेतन धारकांच्या निवृत्तीवेतनात कुटुंब निवृत्तीवेतनात सुधारणा करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः सेनिप्र-२०१९/प्र.क्र.०२/टिएनटी - ६**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड, मंत्रालय,
मुंबई ४०० ०३२,
तारीख: ०९ जानेवारी, २०१९

**वाचा -**

१) शासन निर्णय वित्त विभाग, क्रमांकः सेनिवे १००९/प्र.क्र.३३/सेवा ४, दि.३०/१०/२००९.
२) शासन निर्णय वित्त विभाग, क्रमांकः सेनिवे १००९/प्र.क्र.३३/सेवा ४, दि.१५/१२/२००९.
३) शासन निर्णय शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्रमांकः सेनिवे २०१०/(१६६/१०)/माशि २, दि.९/४/२०१०.
४) शासन निर्णय वित्त विभाग, क्रमांकः न्यायाप्र २०१५/एसएलपी/प्र.क्र.५/सेवा ४, दि.२७/१२/२०१८.

**प्रस्तावना-**

उपरोक्त संदर्भ क्रमांक १ व २ च्या शासन निर्णयान्वये वित्त विभागाने सहाव्या वेतन आयोगाच्या शिफारशीनुसार दिनांक १/१/२००६ नंतर निवृत्त होणाऱ्या राज्य शासकीय कर्मचारी तसेच महाराष्ट्र नागरी सेवा निवृत्ती वेतन नियम लागू असलेल्या निवृत्तीवेतन धारकांच्या निवृत्तीवेतनाबाबत सुधारणा केल्या होत्या. सदर तरतुदी राज्यातील जिल्हा परिषदा, मान्यता प्राप्त खाजगी अनुदानित प्राथमिक, माध्यमिक, उच्च माध्यमिक व अध्यापक विद्यालयातील शिक्षक / शिक्षकेत्तर कर्मचारी यांना शालेय शिक्षण विभागाच्या संदर्भ क्रमांक ३ येथील शासन निर्णयान्वये लागू करण्यात आल्या.

वित्त विभागाच्या दि.३०/१०/२००९ च्या शासन निर्णयातील काही तरतूदी दिनांक १/१/२००६ ऐवजी दिनांक २७/२/२००९ पासून लागू करण्यात आल्या होत्या. मा.उच्च न्यायालयाच्या आदेशानुसार काही तरतूदीमध्ये सुधारणा करण्याचा निर्णय संदर्भ क्रमांक ४ येथील शासन निर्णय अन्वये घेण्यात आला आहे. सदर तरतूदी जिल्हा परिषदा, मान्यता प्राप्त खाजगी १००% अनुदानित प्राथमिक, माध्यमिक, उच्च माध्यमिक व अध्यापक विद्यालयात शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांना लागू करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

१. वित्त विभागाच्या संदर्भ क्र. ४ येथील दि.२७/१२/२०१८ च्या शासन निर्णय अन्वये सुधारित केलेल्या तरतूदी जिल्हा परिषदा, मान्यता प्राप्त खाजगी १००% अनुदानित प्राथमिक, माध्यमिक, उच्च माध्यमिक व अध्यापक विद्यालयात शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांना जशाच्या तशा लागू करण्यात येत आहे.

२. याबाबतचा खर्च सदर निवृत्तीवेतनधारकांचे निवृत्ती वेतन ज्या अर्थसंकल्पीय लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात येतो, त्या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व तो त्या त्या शीर्षातंर्गत मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

तथापि आवश्यक असल्यास संचालक (प्राथमिक, माध्यमिक व उच्च माध्यमिक), पुणे यांनी खर्च भागविण्यासाठी विधीमंडळाच्या येत्या अधिवेशनात पूरक मागणी सादर करण्याची आवश्यक ती कार्यवाही करावी.

३. संचालक (प्राथमिक/माध्यमिक व उच्च माध्यमिक ), पुणे यांनी वरील सूचना सर्व संबंधितांच्या निदर्शनास आणाव्या व निवृत्तीवेतन प्रकरण सुधारण्याबाबत मा. महालेखापाल कार्यालयास सादर करण्यासंदर्भात कार्यवाही करण्याच्या सूचना द्याव्यात.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०१०९१७१०१९२०२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Charushila Devendra Chaudhari

Digitally signed by Charushila Devendra Chaudhari
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=School Education and Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=b99d7dca0e63be1bd1b7158b9523537dcc1d46bc807768647a9ed4ff3816ecf3, cn=Charushila Devendra Chaudhari
Date: 2019.01.09 17:19:20 +05'30'

**( चारूशीला चौधरी )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. प्रधान महालेखापाल (लेखापरीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई,
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई,
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर,
४. महालेखापाल (लेखापरीक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर,
५. मा.उच्च न्यायालय, मुंबई, /नागपूर खंडपीठ,/ औरंगाबाद खंडपीठ,
६. संचालक, लेखा व कोषागरे, मुंबई,
७. उपसंचालक, राज्य अभिलेख देखभाल अभिकरण, नवीन प्रशासकीय भवन,५ वा मजला, मंत्रालयासमोर, मुंबई ३२,
८. अधिदान व लेखा अधिकारी, वांद्रे, मुंबई,
९. संचालक, माहिती व जनसंपर्क विभाग, मंत्रालय,मुंबई,
१०. मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा,कोकण भवन, वाशी, नवी मुंबई
११. उप-मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, मुंबई/पुणे/औरंगाबाद /नाशिक /अमरावती
१२. वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक
१३. निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई
१४. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१५. सर्व विधानमंडळ सदस्य, विधानभवन, मुंबई,
१६. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी

१७. सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी

१८. शिक्षण संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे

१९. सर्व जिल्हयांचे वरिष्ठ लेखा परीक्षक (शिक्षण)

२०. सर्व विभागीय शिक्षण उप संचालक

२१. सर्व शिक्षण अधिकारी/शिक्षण निरीक्षक,

२२. निवडनस्ती.